शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांना सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या लेखाशिर्षाखाली, (०६) दूरध्वनी, वीज व पाणी या उद्दिष्टांतर्गत (डिसेंबर २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर रु. १०.०० कोटी इतक्या निधी मधून २२ संस्थांना रू. ९.९१ कोटी इतका) निधी वितरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय क्रमांकः पुमाअ-२०२१/प्र.क्र. २७१/प्रशा-२
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
तारीख: ०८ मार्च, २०२२

वाचा :-

१) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे पत्र क्रमांकः संवैशिवसं/७८(ड)/०६/पुमा/हिअधि/२०२१-२२/आय-१/१४१३३/२१, दि. १०.११.२०२१
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र. पुमाअ-२०२१/प्र.क्र. २७१/प्रशा-०२, दि. ०८.०२.२०२२

प्रस्तावना: -

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रूग्णालये यांना सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात ०६- दूरध्वनी, वीज व पाणी उद्दिष्टांतर्गत रू. ५.७९ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तथापि, या उद्दिष्टातंर्गत पुरेसे अनुदान मंजूर झालेले नसल्याने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालयातील दूरध्वनी, वीज व पाणी यांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी डिसेंबर, २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात सदर उद्दिष्टातंर्गत रु. १०.०० कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. उक्त एकूण रक्कमेपैकी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, जळगांव (२२१० जी ३४२) या संस्थेस रू. ८.५६ लक्ष इतका निधी वित्त विभागाच्या मान्यतेने दिनांक ०८.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये बीडीएस प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे.

उक्त रू. १०.०० कोटी पुरवणी मागणीच्या रक्कमेपैकी, वित्त विभागाने एकूण २२ संस्थांना उपलब्ध करून दिलेला रू. ९.९१ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयांना सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या लेखाशिर्षाखाली, (०६) दूरध्वनी, वीज व पाणी या उद्दिष्टांतर्गत डिसेंबर २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर रु. १०.०० कोटी इतक्या निधीपैकी खालील २२ संस्थांना एकूण रु. ९,९१,४४,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी एक्याण्णव लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त) इतका निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम हजारात)

| अ. क्र. | संस्थेचे नाव | सांकेतांक क्रमांक | पुरवणी मंजूर रक्कम | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | ससून सर्वोपचार रूग्णालय, पुणे | २२१०१६२५ | २१००० | ० | २१००० |
| २. | शावैमविवरु, नागपूर | २२१०१६४३ | ६७७३ | ० | ६७७३ |
| ३. | सर्वोपचार रूग्णालय, सोलापूर | २२१०१६६१ | ६०१४ | ० | ६०१४ |
| ४. | मयो सर्वोपचार रूग्णालय, नागपूर | २२१०१६९९ | ३३४० | ० | ३३४० |

| अ. क्र. | संस्थेचे नाव | सांकेतांक क्रमांक | पुरवणी मंजूर रक्कम | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| ५. | स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, अंबाजोगाई | २२१०२१७६ | २७०८ | ० | २७०८ |
| ६. | शासकीय दंत महाविद्यालय व रूग्णालय, मुंबई | २२१०२३६३ | १२९ | ० | १२९ |
| ७. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, औरंगाबाद | २२१०२३८१ | १२४२ | ० | १२४२ |
| ८. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मिरज | २२१०२४०७ | ८६९ | ० | ८६९ |
| ९. | शासकीय दंत महाविद्यालय व रूग्णालय, औरंगाबाद | २२१०२४७२ | १५ | ० | १५ |
| १०. | श्री गुरू गोविंदसिंग स्मृती रूग्णालय, नांदेड | २२१०३३३२ | ८२७७ | ० | ८२७७ |
| ११. | श्री वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ | २२१०४२९५ | २४०८ | ० | २४०८ |
| १२. | श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे | २२१०४३०१ | २१२६ | ० | २१२६ |
| १३. | अतिविशेषोपचार रूग्णालय, नागपूर | २२१०४४३७ | १२७७ | ० | १२७७ |

| अ. क्र. | संस्थेचे नाव | सांकेतांक क्रमांक | पुरवणी मंजूर रक्कम | यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १४. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला | २२१०५०६८ | ३११७ | ० | ३११७ |
| १५. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, कोल्हापूर | २२१०५०७७ | ४२५ | ० | ४२५ |
| १६. | सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर | २२१०५०९५ | २२६५१ | ० | २२६५१ |
| १७. | सर्वोपचार रूग्णालय, लातूर | २२१०५१०१ | ४०७५ | ० | ४०७५ |
| १८. | सर्वोपचार रूग्णालय, अकोला | २२१०५११२ | ४९१३ | ० | ४९१३ |
| १९. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर | २२१०F०९५ | १४९७ | ० | १४९७ |
| २०. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, चंद्रपूर | २२१०G२७१ | ३२६५ | ० | ३२६५ |
| २१. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव | २२१०G३३१ | ४५७ | ० | ४५७ |
| २२. | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, जळगांव | २२१०G३४२ | ३४२२ | ८५६ | २५६६ |
| | | **एकूण** | **१०००००** | **८५६** | **९९१४४** |

२. उपरोक्त प्रमाणे रु. ९,९१,४४,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी एक्याण्णव लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पिय निधी बीडीएस वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला

असून विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील वित्तीय नियमांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ७७/२०२२ व्यय-१३, दिनांक १६.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८१२२७३६९४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459,
pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972,
serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.03.09 11:56:30 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
६. सर्व संबंधित अधिष्ठाता, संबंधित शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½, नागपूर/मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी मुंबई.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (प्रशा-२), वैद्यकीय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई.